उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालयांमधील रिक्त पदे भरण्यावरील निर्बंध शिथील करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: आढावा-१५१३/प्र.क्र.१२५/म.शि.५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२.
दिनांक :- ०३ नोव्हेंबर, २०१८

**वाचा**:- १) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक:एसआरव्ही २०१५/प्र.क्र.२९०/का-१२, दि.१६ जुलै, २०१५
२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक:पदनि-२०१६/प्र.क्र.३०/२०१६/आ.पु.कक्ष, दि.२५मे, २०१७
३) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक:पदनि-०६१७/प्र.क्र.२०/२०१६/आ.पु.क., दि.९ जून, २०१७
४) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक:पदनि०६१७/प्र.क्र.२०/२०१६/आपुक, दि.२९ जून, २०१७

**प्रस्तावनाः-**

संदर्भाधीन क्रमांक (१) येथील वित्त विभाग शासन निर्णय, दिनांक २५ मे, २०१७ नुसार आकृतिबंध अंतिम मंजूर होईपर्यंत नवीन पदनिर्मिती तसेच पदभरतीवर निर्बंध घालण्यात आले आहेत. त्याप्रमाणे राज्यातील अकृषि विद्यापीठाशी संलग्नित उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील शिक्षक व शिक्षकेतर पदांचा आढावा वित्त विभागास सादर करण्यात आला होता. दरम्यान राज्यातील अकृषि विद्यापीठाशी संलग्नित उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील अशासकीय अनुदानित महाविद्यालयांमधील रिक्त पदे भरण्यावरील निर्बंध उठवून पदभरती करणेबाबतची मागणी मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे रिट याचिका क्रमांक २३६७/२०१८ व इतर २१ रिट याचिकाद्वारे करण्यात आली आहे. मा. न्यायालयाने या संदर्भात तात्काळ निर्णय घेण्याचे निर्देशित केलेले आहे.

प्रस्तुत पदांचा आकृतिबंध दिनांक ०९.०८.२०१८ रोजी उच्चस्तरीय सचिव समितीसमोर ठेवण्यात आला असता, त्यांनी पदभरती संबंधीचे निकष तपासण्याचे निर्देश अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, प्रधान सचिव लेखा व कोषागारे, वित्त विभाग सचिव (व्यय) वित्त विभाग व सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांच्या समितीस दिले. अशासकीय अनुदानित महाविद्यालयातील रिक्त असलेल्या शिक्षक व शिक्षकेतर पदभरतीच्या अनुषंगाने दाखल न्यायालयीन प्रकरणे लक्षात घेऊन, उक्त समितीने केलेल्या शिफारशी दिनांक १४.०९.२०१८ रोजी झालेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीत ठेवण्यात आल्या. आकृतिबंध अंतिम करण्यापूर्वी काही बाबींची पूर्तता करण्याचे निर्देश उच्चस्तरीय सचिव समितीने दिले. त्याचप्रमाणे विद्यार्थ्यांचे शैक्षणिक हीत विचारात घेऊन, शिक्षकीय एकाकी रिक्त पदे व काही अत्यावश्यक शिक्षकेतर तांत्रिक रिक्त पदे ही १०० टक्के तसेच सहायक प्राध्यापकांच्या रिक्त पदांच्या ४० टक्के पदे भरण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार राज्यातील अकृषि विद्यापीठाशी संलग्नित उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील अशासकीय अनुदानित महाविद्यालयांमधील रिक्त असलेली शिक्षकीय व शिक्षकेतर पदे भरण्यावरील निर्बंध उठवून पदभरती करण्यास काही अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

राज्यातील अकृषि विद्यापीठाशी संलग्नित उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील मान्यताप्राप्त अशासकीय अनुदानित महाविद्यालयांमधील रिक्त पदे भरण्यावरील निर्बंध शिथील करुन खालीलप्रमाणे शिक्षकीय व शिक्षकेतर पदे भरण्यास मान्यता देण्यात येत आहे. खालीलप्रमाणे पदभरतीस मान्यता देताना दिनांक ०१.१०.२०१७ च्या विद्यार्थी संख्येवर अनुज्ञेय होणारी रिक्त पदे ही आधारभूत मानून ग्राह्य धरण्यात आली आहेत. मात्र, आकृतिबंधास वित्त विभागाची अंतिम मंजुरी मिळेपर्यंत सदरची पदे अंतिम समजण्यात येऊ नयेत.

**दिनांक ०१.१०.२०१७ च्या विद्यार्थी संख्येवर अनुज्ञेय होणारी रिक्त पदे**

| अ. क्र | पदनाम | अनुज्ञेय पदे | भरलेली पदे | रिक्त पदे | पदभरतीस मान्यता दिलेली पदे | पदभरतीचे प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | शारीरिक शिक्षण संचालक | ९६१ | ८२२ | १३९ | **१३९** | रिक्त पदांच्या १००% |
| २ | अधिव्याख्याता (सहायक प्राध्यापक) | ३११८५ | २२२३६ | ८९४९ | **३५८०** | रिक्त पदांच्या ४०% |
| ३ | ग्रंथपाल | ११५४ | ९९१ | १६३ | **१६३** | रिक्त पदांच्या १००% |
| ४ | प्रयोगशाळा सहायक | २११६ | १२६० | ८५६ | **८५६** | रिक्त पदांच्या १००% |
| | | | | **एकूण** | **४७३८** | |

**उपरोक्त पद भरतीची मान्यता ही पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहील.**

१) राज्यातील अशासकीय अनुदानित महाविद्यालयांमधील शिक्षक व शिक्षकेतर पदांचा आकृतिबंध निश्चित करण्याच्या अनुषंगाने उच्चस्तरीय सचिव समितीने काही बाबींची पूर्तता करण्याचे निर्देश दिलेले असल्याने, अद्याप आकृतिबंध निश्चित झालेला नाही. त्यामुळे पद भरतीवरील निर्बंध शिथील करुन उपरोक्त प्रमाणे पद भरतीस मान्यता देतांना दिनांक ०१.१०.२०१७ च्या विद्यार्थी संख्येवर अनुज्ञेय होणारी रिक्त पदे ही आधारभूत मानून ग्राह्य धरण्यात आली आहेत. मात्र, आकृतिबंध अंतिम झालेला नसल्याने आकृतिबंधास वित्त विभागाची अंतिम मंजुरी मिळेपर्यंत सदरची पदे अंतिम समजण्यात येऊ नयेत.

२) मान्यता दिलेल्या शिक्षकीय पदांची पदभरती करताना प्रत्येक महाविद्यालयास संबंधित विद्यापीठ/नियामक प्राधिकरणाने दिलेली संलग्नता (Affiliation) अबाधित राहण्यासाठी तसेच महाविद्यालयाचे मूल्यांकन (Accreditation) व पुर्नमूल्यांकन (Reaccreditation) होण्याकरिता आवश्यक असलेली मर्यादा विचारात घेऊनच शिक्षकीय पदांचे वाटप करण्यात यावे, असे वाटप करतांना सर्व महाविद्यालयांची पदे समान प्रमाणात भरली

जातील याची दक्षता घेण्यात यावी. याबाबत सखोल तपासणी करुन मान्यता दिलेल्या सहायक प्राध्यापकांच्या पदांचे वाटप करण्यासंदर्भातील सविस्तर प्रस्ताव संचालक, उच्च शिक्षण यांनी विभागाच्या मान्यतेसाठी सादर करावा.

३) उक्त मर्यादेपेक्षा अधिकची पदे कोणत्याही परिस्थितीत भरण्यात येऊ नयेत.

२. सदरचा शासन निर्णय उच्चस्तरीय सचिव समितीच्या दिनांक १४ सप्टेंबर, २०१८ च्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५४९/आपुक, दिनांक ०५.१०.२०१८ व अनौपचारिक संदर्भ क्र. ७८२/१८/व्यय-५, दिनांक ०५.१०.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८११०३११४५४६१४०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Rohini Bhalekar

Digitally signed by Rohini Bhalekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=440c600559857f4234e969f892346c88247ac81346a1b7229bf9917deb7bce48, cn=Rohini Bhalekar
Date: 2018.11.03 14:31:57 +05'30'

**( रोहिणी भालेकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुंख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा.मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक
६. सर्व मा.विधानसभा सदस्य व विधान परिषद सदस्य
७. मा.मुख्य सचिव
८. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
९. सर्व विभागीय आयुक्त,
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१२. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा/मूळ शाखा, मुंबई
१३. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१५. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. मा. कुलगुरु, सर्व अकृषि विद्यापीठे.

१७. सर्व विभागीय सहसंचलाक, उच्च शिक्षण.
१८. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे.
१९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), नागपूर/मुंबई, महाराष्ट्र/मुंबई १/२.
२०. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
२१. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२२. सर्व जिल्हा कोषाधिकारी यांची कार्यालये.
२३. मा. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२४. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२५. म.शि.५ कार्यासन, निवडनस्ती.